**जिल्हा रुग्णालय, रत्नागिरी येथील सांडपाणी प्रक्रिया संयंत्र बसविण्याच्या रु.१, ७६,३३००९/- इतक्या कामाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत..**

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक आरोग्य विभाग

## शासन निर्णय क्रमांकः प्रशामा २०१६ / प्रक्र-३९०/ आरोग्य ३(अ)

गो.ते.रुग्णालय संकुल इमारत, १० वा मजला,
मंत्रालय, एल.टी.मार्ग, मुंबई- ४०० ००१.
दिनांक: ३ फेब्रुवारी, २०१७.

**संदर्भ:-**

१)संचालक,आरोग्य सेवा मुंबई यांचे पत्र क्रमांक : संआसे/कक्ष-३/टे-६/ जिरुरत्नागिरी सांडपाणी प्रक्रिया/१८४१६-१७/१६,दिनांक २७.१०.२०१६.

**प्रस्तावना :-**

जिल्हा रुग्णालय,रत्नागिरी येथील सांडपाणी प्रक्रिया संयंत्र बसविण्याच्या रु.१,७६,३३,००९/- इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय:-**

२. जिल्हा रुग्णालय,रत्नागिरी येथील सांडपाणी प्रक्रिया संयंत्र बसविण्याच्या रु.१,७६,३३,००९/- इतक्या खर्चाच्या अंदाजपत्रकांना खालील अटी व शर्तींच्या अधिन राहून या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे :-

**अटी व शर्ती-:**

१) कामासाठी निविदा मागविण्याआधी सदर कामास सार्वजनिक बांधकाम विभागातील सक्षम अधिकाऱ्यांची तांत्रिक मंजुरी घेणे आवश्यक राहील.

२) सदर कामाची निविदा काढतांना प्रत्येक कामाची स्वतंत्रपणे निविदा न काढता नमूद सर्व कामांसाठी एकच निविदा काढण्यात यावी.

३) क्षेत्रिय जागेच्या परिस्थितीनुसार व आरोग्य संस्थांच्या आवश्यकतेनुसार प्रस्तावित कामाची किंमत वाढणे शक्य असल्यामुळे त्यासाठी आवश्यक प्रस्ताव सार्वजनिक बांधकाम विभागाच्या त्या-त्या भागाच्या क्षेत्रिय अधिकाऱ्यांकडून करुन घ्यावेत.

४) सदरचे अंदाजपत्रक हे ढोबळ नमुना अंदाजपत्रक असल्याने, या कामांच्या सविस्तर अंदाजपत्रकांना तांत्रिकदृष्ट्या मान्यता ही सार्वजनिक बांधकाम खात्याच्या त्या त्या क्षेत्राच्या सक्षम अधिकाऱ्यांकडून करण्यात येईल. अशी तांत्रिक मान्यता करीत असताना आरोग्य

खात्याच्या त्या-त्या आरोग्य सेवा मंडळाच्या उप संचालकांच्या सहमतीने तरतुदी अंतिम करण्यात याव्यात.

५) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग,शासन निर्णय, क्र.इएनव्ही-२०१३ /प्र.क्र.१७७ / तां.क.१, दि.१० जानेवारी,२०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार कार्यवाही करण्यात यावी.

६) सदर कामाचा खर्च सार्वजनिक आरोग्य विभागाने त्यांच्याकडे उपलब्ध असलेल्या नियतव्ययामधून भागविण्यात यावा.

३. जिल्हा रुग्णालय ,रत्नागिरी येथील सांडपाणी प्रक्रिया संयंत्र बसविण्याच्या रु.१,७६,३३,००९ /- इतक्या रक्कमेचा खर्च मागणी क्रमांक- आर-१ मुख्यलेखाशिर्ष "४२१०- वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ०१- नागरी आरोग्य सेवा-(वैद्यकीय सहाय्य), ११०-रुग्णालये व दवाखाने, (१)(अ) पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-इमारती, (००)(०१) मोठी बांधकामे (४२१०००१४), ५३-मोठी बांधकामे " याखाली सन २०१६-१७ च्या उपलब्ध अनुदानातून भागविण्यात यावा.

४. हे आदेश शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक- विअप्र २०१३ / प्र.क्र.३० / विनियम, दिनांक १७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्ट, भाग पहिला, उपविभाग-पाच मधील अनुक्रमांक-१, परिच्छेद क्रमांक- १३४ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०२०३१३२३२४०८१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Arun Vithoba Kadam

Digitally signed by Arun Vithoba Kadam
DN: cn=Arun Vithoba Kadam, o=Mantralay, ou=PHD, email=arun.kadam@nic.in, c=US
Date: 2017.02.03 15:45:08 +05'30'

(अ.वि.कदम)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. महालेखापाल,महाराष्ट्र-१/२(लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता),मुंबई.
२. आयुक्त,आरोग्य सेवा तथा संचालक,राष्ट्रीय आरोग्य अभियान,मुंबई
३. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई.
४. संनियंत्रक तथा मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई
५. सह संचालक, आरोग्य सेवा रुग्णालये (राज्यस्तर), मुंबई

६. उपसंचालक,आरोग्य सेवा मंडळ,कोल्हापूर,
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
८. कार्यासन अधिकारी,सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-३), मंत्रालय, मुंबई.
९. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०.अवर सचिव,(आ.३),सार्वजनिक आरोग्य विभाग,मंत्रालय,मुंबई
११.निवडनस्ती (आरोग्य-३अ).